<u>नवीन वाहन खरेदी करण्यास मंजूरी देण्याबाबत.</u>

**महाराष्ट्र शासन**

**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: आस्थाप्र-१०१३/प्र.क्र.१८६/ना.पु.१५**

मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : २१ जानेवारी, २०१५

**वाचा :-** (१) या विभागाचा शासन निर्णय क्रमांक वाहन-२०१२/१६०/ प्र.क्र.३८/ना.पु.१२ दिनांक १२ नोव्हेंबर, २०१२

(२) या विभागाचा शासन निर्णय क्र. आस्थाप्र-२८१३/प्र.क्र. २८५/ना.पु.१५, दिनांक २० ऑगस्ट, २०१४.

(३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.वाहन-२०१४/प्र.क्र.९/१४/विनियम, दिनांक ४ ऑगस्ट, २०१४

**-: शासन निर्णय :-**

अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक वाहन-२०१२/१६०/ प्र.क्र.३८/ना.पु.१२, दिनांक १२ नोव्हेंबर, २०१२ अन्वये, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग (खुद्द) व अधिनस्त कार्यालयांना अनुज्ञेय असलेल्या वाहनांचा आढावा घेण्यात आला आहे. सदर आढाव्यानुसार अन्नधान्य वितरण अधिकारी कार्यालयांसाठी ४ वाहने (१ कार + ३ जीप) जिल्हा पुरवठा अधिकारी कार्यालयांसाठी ३३ वाहने (३ कार + ३० जीप) व संचालक, नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई यांना १ कार अनुज्ञेय आहे. सदर आढाव्यानुसार, तसेच वित्त विभागाच्या उपरोक्त संदर्भ क्रमांक (३) चे शासन निर्णयातील तरतुदीनुसार खाली नमुद कार्यालयातील अन्नधान्य वितरण अधिकारी व जिल्हा पुरवठा अधिकारी या क्षेत्रिय स्तरावरील गट-अ मधील अधिकाऱ्यांना, कार्यालयीन वापरासाठी निर्लेखित केलेल्या जुन्या वाहनांच्या बदल्यात प्रत्येकी १ याप्रमाणे एकूण ६ नवीन वाहन खरेदी करण्यास अध्यक्ष, राज्यस्तरीय वाहन आढावा समिती, वित्त विभाग यांनी मान्यता दिलेली आहे :-

१) अन्नधान्य वितरण अधिकारी, सोलापूर (१ वाहन)

२) जिल्हा पुरवठा अधिकारी, भंडारा (१ वाहन)

३) जिल्हा पुरवठा अधिकारी, अहमदनगर (१ वाहन)

४) जिल्हा पुरवठा अधिकारी, रायगड (१ वाहन)

५) जिल्हा पुरवठा अधिकारी, यवतमाळ (१ वाहन)

६) संचालक, नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई ( १ वाहन )

२. शासन निर्णय, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, क्रमांक आस्थाप्र-२८१३/प्र.क्र.२८५/ ना.पु.१५, दिनांक २० ऑगस्ट, २०१४ अन्वये, नवीन पालघर जिल्हा पुरवठा

अधिकारी यांना वाहन खरेदीसाठी रूपये ८.०० लाख या खर्चास मान्यता देण्यात आली आहे. मात्र आता वित्त विभाग, शासन निर्णय क्र.वाहन-२०१४/प्र.क्र.९/१४/विनियम, दिनांक ४ ऑगस्ट, २०१४ च्या सुधारित आदेशानुसार वाहन खरेदासाठी रूपये ६.०० लाख इतकी मर्यादा विहीत करण्यात आली आहे. त्यानुसार जिल्हा पुरवठा अधिकारी, पालघर यांना वाहन खरेदीसाठी रू. ६.०० लाख इतके अनुदान उपलब्ध करून देणे आवश्यक आहे.

३. उपरोक्तनुसार सन २०१४-१५ या वित्तिय वर्षात कार्यालयीन खर्चासाठी उपलब्ध असलेल्या अनुदानातून शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/ २००८/ विनियम, दिनांक १५ मे, २००९ सोबतच्या परिशिष्ट भाग पहिला-उपविभाग दोन मधील अनुक्रमांक १९ ब, नियम क्र. ६९ पुढे देण्यात आलेल्या अटींच्या अधिन राहून खाली नमूद कार्यालयातील अधिकारी यांचेकरिता प्रत्येकी एक याप्रमाणे एकूण सहा नवीन वाहने खरेदी करण्यासाठी एकूण रूपये ३६.०० लाख इतके अनुदान मंजूर करण्यास याद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

१) अन्नधान्य वितरण अधिकारी, सोलापूर ( १ वाहन )

२) जिल्हा पुरवठा अधिकारी, भंडारा ( १ वाहन )

३) जिल्हा पुरवठा अधिकारी, अहमदनगर ( १ वाहन )

४) जिल्हा पुरवठा अधिकारी, रायगड ( १ वाहन )

५) जिल्हा पुरवठा अधिकारी, यवतमाळ ( १ वाहन )

६) जिल्हा पुरवठा अधिकारी, पालघर ( १ वाहन )

४. यापूर्वी वाहन नसल्याने, वाहन भाडयाने घेण्यास दिलेल्या परवानगीनुसार वाहने भाडयाने घेतली असल्यास, ती खंडीत करण्यात यावी.

५. यासाठी होणारा खर्च, मुख्य लेखाशिर्ष-२४०८ अन्न साठवण व वखार साठवण, ०१ अन्न १०१ (०३) प्रापण, वितरण व किंमत नियंत्रण (०३) (०२) (२४०८०१०८) दत्तमत (१३) कार्यालयीन खर्च या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सन २०१४-१५ या वित्तिय वर्षात मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय वित्त विभाग क्र. विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/ विनिमय, दिनांक १५ मे, २००९ सोबतच्या परिशिष्ट भाग पहिला-उपविभाग दोन मधील अनुक्रमांक १९ ब, नियम क्र. ६९ नुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारास अनुसरुन तसेच वित्तीय सल्लागार व उप सचिव यांच्या अनौपचारिक संदर्भ जावक क्र.१२-५४, दिनांक १५ जानेवारी, २०१५ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०१२११४१५३८५४०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावांने,

BASWANT SUNIL DEOMAN

Digitally signed by BASWANT SUNIL DEOMAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD. CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION,CID - 917973, postalCode=400032, st=Maharashtra, cn=BASWANT SUNIL DEOMAN
Date: 2015.01.21 14:31:18 +05'30'

**( सु.दे. बसवंत )**
कार्यासन अधिकारी.

**प्रति,**

१. जिल्हाधिकारी/ संबंधित अन्नधान्य वितरण अधिकारी/ जिल्हा पुरवठा अधिकारी (सोलापूर, भंडारा, अहमदनगर, रायगड, यवतमाळ, पालघर)

**प्रत** :- १. सर्व विभागीय आयुक्त/उप आयुक्त पुरवठा.

२. संबंधित कोषागार अधिकारी (सोलापूर, भंडारा, अहमदनगर, रायगड, यवतमाळ, पालघर).

३. महालेखापाल -१ व २ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.

४. सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहायक.

५. सर्व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग.

६. वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.

७. उप सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

८. निवड नस्ती, कार्यासन ना.पु.१५.